तहसिलदार संवर्गातील अधिकाऱ्यांची
पदस्थापना (नाशिक विभाग)

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्र. बदली-२०२३/प्र.क्र.१०२/ई-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ३० जून, २०२३

**संदर्भ:-** १) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५
२) सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना क्र.एसआरव्ही-२०२१/प्र.क्र.४९/कार्या-१२, दि.१४.०७.२०२१

**शासन आदेश:-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४(४) मधील तरतुदींनुसार खाली नमूद केलेल्या तहसिलदार संवर्गातील अधिका-यांना प्रशासकीय कारणास्तव त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र.४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पदावर सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने पदस्थापना देण्यात येत आहे.

| क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्याचे पदनाम | बदलीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १. | श्री. भाऊसाहेब थोरात | नियुक्तीच्या प्रतिक्षेत | **तहसिलदार चोपडा जि.जळगाव या रिक्त पदावर** |
| २. | श्री मिलिंदकुमार वाघ | तहसिलदार (निवडणूक) जि. का. अहमदनगर | **पदस्थापनेत अंशत: बदल करुन तहसिलदार श्रीरामपूर जि.अहमदनगर या रिक्त पदावर** |
| ३. | श्री. प्रदीप पाटील | नियुक्तीच्या प्रतिक्षेत | **तहसिलदार (निवडणूक) जि. का. अहमदनगर या श्री. मिलिंदकुमार वाघ यांच्या बदलीने रिक्त होणा-या पदावर** |
| ४. | श्री. प्रशांत जयंत कुलकर्णी | सहाय्यक जिल्हा पुरवठा अधिकारी, जळगाव | **तहसिलदार सुरगाणा जि.नाशिक या रिक्त पदावर** |

२. सदरील आदेश तात्काळ अंमलात येत असून उपरोक्त नमूद अधिका-यांना बदलीने पदस्थापना दर्शविण्यात आलेल्या पदावर तात्काळ रुजू होण्यासाठी ते धारण करत असलेल्या पदावरून या आदेशान्वये एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे. त्यांनी त्यांच्या पदस्थापनेच्या पदावर दि.०३ जुलै, २०२३ (म.पू.) रोजी पुर्वी रुजू होणे अनिवार्य आहे.

३. संबधित अधिकारी नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत e३.revenue@maharashtra.gov.inया ई-मेलव्दारे / टपालाव्दारे शासनास त्वरीत कळवावे.

४. संबंधित अधिकारी हे महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ च्या नियम १५ अन्वये विहित केलेल्या उक्त तरतूदींनुसार, पदग्रहण अवधी समाप्त होण्यापूर्वी बदलीच्या ठिकाणी रुजू झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास, त्यांचेविरुद्ध शासन निर्णय, क्र.संकीर्ण २०१६/ प्र.क्र.१८६/ १६/

कार्यासन १४, दि.२३.१२.२०१६ मधील तरतूदींनुसार **शिस्तभंगविषयक कारवाई** करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

५. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमांनुसार दिलेल्या विहित कालावधीत संबंधित अधिकारी यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी दि. ०३ जुलै, २०२३ (म.पू.) रोजी पुर्वी रुजू होण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा या पदस्थापनेच्या पदावर रुजू न झाल्यास, त्यांचा **अनुपस्थितीचा कालावधी हा "अकार्यदिन"** *(dies non)* **म्हणून गणला जाईल**, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

६. संबंधित अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करू नये. तसेच, महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यांना मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत.

७. सदरहू आदेशानुसार तात्काळ पदस्थापनेच्या पदावर रूजू न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लघंन करणारी असल्यामूळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०६३०२२०००९७५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने, AJIT SOPANRAO DESHMUKH

Digitally signed by AJIT SOPANRAO DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c7f9815c89488c717b56e1ae0b06802c87d325011b06b9fb27982 3a37e0511b2, pseudonym=06DBBC5D80F944565DD5BDEF080730B6FF4B904B, serialNumber=704CB545C50221B15CDE7CCB8854E694C765DFB3A0240E 891EBFB56EE79E3440, cn=AJIT SOPANRAO DESHMUKH
Date: 2023.06.30 22:02:43 +05'30'

**(अजित देशमुख)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रति,**

विभागीय आयुक्त, नाशिक.

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव
४. संबंधित जिल्हाधिकारी.
५. प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर.
६. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
७. संबंधित अधिदान व लेखा अधिकारी.
८. संबंधित आहरण व संवितरण अधिकारी.
९. अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. संबंधित तहसिलदार (विभागीय आयुक्त, नाशिक यांचेमार्फत).
११. उप सचिव (ई-३) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१२. निवडनस्ती (ई-३).